शासकीय सेवेत मागासवर्गीय कर्मचारी/अधिकारी यांची गा-हाणी/निवेदने यांचेवर विनाविलंब कार्यवाही करण्याबाबतचे तसेच आरक्षण विषयक आदेशांची अंमलबजावणी काटेकोरपणे करण्याबाबत.

---

शिस्तभंग विषयक कारवाई.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांकः बीसीसी-1093/1401/प्र.क्र.125/93/16-ब,
मंत्रालय, मुंबई 400 032. दिनांक 28 जुलै 1993.

पहा:- शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः बीसीसी-1086/573/16-ब, दिनांक 12 ऑक्टोबर 1990.

परिपत्रकः- शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक बीसीसी-1086/573/16-ब, दिनांक 12 ऑक्टोबर 1990 अन्वये शासनाने असे आदेश निर्गमित केले आहेत की, मागासवर्गीयांच्या सेवाविषयक तक्रारी/गा-हाणी यांच्या संदर्भात मागासवर्ग कक्षाकडून मागविण्यात आलेले अभिप्राय तातडीने व एक महिन्याच्या आत पाठविण्यात यावेत. सदर माहिती 1 महिन्याच्या आत पाठविण्यात आली नाही तर अशा प्रकरणी शासनास गंभीर दखल घेऊन संबंधितांविरुध्द नियमाप्रमाणे कारवाई करावी लागेल. तसेच शासनाने आरक्षण विषयक वेळो-वेळी जे आदेश निर्गमित केले आहेत त्यांची काही कार्यालयांकडून नीटपणे अंमलबजावणी केली जात नाही व त्याकडे दुर्लक्ष करुन टाळाटाळ केली जाते. आरक्षण विषयक आदेशांची अंमलबजावणी करण्यात जे अधिकारी दुर्लक्ष व निष्काळजीपणा दाखवतील त्यांच्याविरुध्द शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल असेही त्या आदेशात नमूद करण्यात आले आहे. तथापि ब-याच विभागात/ कार्यालयात शासनाने वेळोवेळी जे आरक्षणविषयक आदेश निर्गमित केले आहेत त्यांची अंमलबजावणी होत नसल्याचे आढळून आले आहे. यासंदर्भात जुलै 1993 च्या अधिवेशनामध्ये विधानपरिषदेमध्ये चर्चा झाली होती व या चर्चेत मा.सभासदांनी आरक्षणविषयक धोरणाचे पालन न करणा-या अधिका-यांविरुध्द/कर्मचा-यांविरुध्द कठोर कारवाई करण्याची मागणी केली आहे. त्या चर्चेच्या अनुषंगाने सर्व संबंधितांना याबाबत पुनः एकदा सूचना देण्यात येत आहेत की जे अधिकारी सेवा विषयक बाबींच्या आदेशांच्या अंमलबजावणी संदर्भात दुर्लक्ष किंवा निष्काळजीपणा दाखवतील असे संबंधित अधिकारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील. सक्षम अधिका-याने शासकीय आदेशाप्रमाणे कार्यवाही न करणा-या त्यांच्या नियंत्रणा-खालील अधिका-यांविरुध्द नियमाप्रमाणे शिस्तभंग विषयक कारवाई सुरु करावी व त्यांची माहिती सामान्य प्रशासन विभागाला कळवावी.

सर्व मंत्रालयीन विभाग/विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांनी वरील आदेशांची योग्य ती नोंद घेऊन त्याचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता घ्यावी. तसेच सर्व मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील शासकीय कार्यालये, उपक्रम, मंडळे, महामंडळे, सहकारी संस्था, इत्यादींच्या निदर्शनास वरील आदेश आणावेत व त्यांचे काटेकोरपणे पालन करण्याच्या सूचना निर्गमित कराव्यात. मंत्रालयीन विभाग याबाबत ज्या सूचना निर्गमित करतील त्यांनी एक प्रत सामान्य प्रशासन विभागास (मागासवर्ग कक्ष) न चुकता पृष्ठांकित करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शांता शास्त्री,
सचिव(सेवा), महाराष्ट्र शासन.

शामुमु-रोटा-साप्रवि-एच-751(3,000-7-93)

(कृ.मा.प.)

प्रति

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्य मंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,
सचिव, सर्व प्रादेशिक निवड मंडळे,
संचालक, समाजकल्याण, पुणे,
संचालक, आदिवासी विकास, नाशिक,
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
सर्व जिल्हा प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी प्रकल्प,
सर्व जिल्हा सेवायोजन अधिकारी,
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील इतर सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख.

* पत्राने.

---

एच-751(3000-7-93)-अ